**कृषि विभागांतर्गत शेती सल्ला, प्रशिक्षण, निर्यात वाढ इत्यादी बाबीसंदर्भात अभ्यास करण्यासाठी एक सदस्यीय अभ्यास समिती स्थापना करणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्र.:कृवपदुम-१९०५४(११)/२४/२०२५-MAG-८A(E-११०९७०७)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०२ जून, २०२५

**संदर्भ** :- कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. कृव्यप्र ४६१९/प्र.क्र. ७०/८ अे, दि. ११/०९/२०१९

**प्रस्तावना :-**

राज्यात जागतिक बॅक अर्थसहाय्यित मा. बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी दिनांक ११.९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. "राज्यातील अल्पभूधारक शेतकरी आणि कृषि नवउद्योजकांना केंद्रस्थानी ठेवून सर्वसमावेशक आणि स्पर्धात्मक शेतमाल मूल्यसाखळयांच्या विकासाला मदत करणे" हे प्रकल्पाचे उद्दिष्ट आहे. स्मार्ट प्रकल्पातील घटक अ अंतर्गत कृषी विभागाची संस्थात्मक क्षमता वाढविणे कामगिरी आधारित वितरण निर्देशक हा घ्टक असून त्यामध्ये कृषि विभागाची पुर्नरचना व सक्षमीकरण, विभागातील अधिकारी व कर्मचारी यांची क्षमता बांधणी विकसित करणे व शेतकऱ्यांना तांत्रिक सहाय्य करणे, मूल्यसाखळीवर्धन करणे या उपघटकांचा समावेश आहे. यानुषंगाने या घटक/उपघटकांतर्गत कृषि विषयक सल्ला/मार्गदर्शन, प्रशिक्षण, तंत्रज्ञानाबाबतची माहिती याबाबत अभ्यास समिती स्थापन करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील शेतकऱ्यांना कृषि विषयक सल्ला/मार्गदर्शन, प्रशिक्षण, तंत्रज्ञानाबाबतची माहिती, निर्यात वाढ, कृषी संबंधी विविध योजना, कार्यक्रम, उपक्रम, नियोजन, निर्यात वाढ, हवामान बदल इत्यादी बाबीसंदर्भात अभ्यास करण्यासाठी श्री. उमेशचंद्र सारंगी, सेवानिवृत्त भाप्रसे यांची "एक सदस्यीय" अभ्यास समिती स्थापना करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे आहे.

१) शेतकऱ्यांना पीक उत्पादन, खत व्यवस्थापन, कीड व रोग व्यवस्थापन याबाबत सल्ला/मार्गदर्शन देण्यासाठी कार्यप्रणाली/कार्यपद्धती निश्चिती, कृषि विषयक विस्तार व प्रशिक्षण अंतर्गत शेतकरी अधिकारी, कर्मचारी यांच्या क्षमताबांधणी, शेतकरी अधिकारी प्रशिक्षण, प्रचार व प्रसिध्दी इत्यादी.

२) कृषि विभागातील सध्या बंद असलेल्या खत/किटकनाशक अंश तपासणी प्रयोगशाळा कार्यान्वित करणे. कृषि विभागाच्या अखत्यारितील उपलब्ध साधन संपत्ती /पायाभूत सुविधांचा कार्यक्षमतेचा वापर करणे संदर्भात उपाययोजना

३) खरीप व रब्बी या दोन्ही हंगामातील प्रमुख पिकांसाठी कृषी विद्यापीठे व कृषि विज्ञान केंद्र यांच्या सहकार्याने शिवार फेरी ही संकल्पना प्रभावीपणे राबविणे

४) शेतीच्या पाण्याचे योग्य नियोजन करण्यासाठी दीर्घकालीन आराखडा तयार करणे.

५) राज्यातील शेतमाल निर्यातीला चालना देणे

६) शेतमालाच्या बाजार व्यवस्थेतील मध्यस्थांची साखळी कमी करणे

७) कृषि शिक्षण आणि संशोधनाच्या संधींची सद्यस्थिती आणि अडचणी, कृषि विद्यापीठाने बदलत्या काळानुरुप तंत्रज्ञानाचा अवलंब करणे

८) राज्यातील शेतीवर हवामान बदलाचा परिणाम आणि कोरडवाहू शेतीला आवश्यक हवामानाकुल तंत्रज्ञान व धोरण

३. सदर समितीचा कार्यकाळ चार महिने इतका असेल. या कार्यकाळात समितीचे अहवाल देणे अनिवार्य असेल. यासाठी श्री. सारंगी यांना एकूण रु. ६,००,०००/- (अक्षरी रुपये सहा लाख) इतके मानधन देय राहील.

४. सदर समितीसाठी पुणे येथे कार्यालय तसेच उपसंचालक दर्जाचा अधिकारी व एक लघुलेखक यांच्या सेवा आयुक्त (कृषि) कार्यालय यांनी उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

५. सदर अभ्यास समितीला क्षेत्रिय/विद्यापीठ स्तरावर सहकार्य/माहिती उपलब्ध करुन देण्याबाबत आयुक्त (कृषि)/महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद (MCEAR) यांनी अधिनस्त कार्यालयांना सूचना द्याव्यात.

६. सदर अभ्यास समितीच्या अनुषंगाने मानधन, दौराविषयक खर्च मा. बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन (स्मार्ट) प्रकल्पांतर्गत घटक 'अ' अंतर्गत प्राप्त निधीतून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतसथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०६०२११२०४१३२०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकन करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2025.06.02 11:22:46 +05'30'

**(अंबादास सा. चंदनशिवे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई
३) सर्व विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
४) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. उपमुख्यमंत्री (महसूल), महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे
१३) प्रकल्प संचालक, मा. बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प (स्मार्ट), पुणे
१४) श्री. उमेश्चंद्र सारंगी, सेवानिवृत्त भाप्रसे,
१५) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
१६) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
१७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१८) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
२०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२१) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२२) निवडनस्ती